सुधारीत प्रशासकीय मान्यता-
जव्हार, जि.ठाणे येथे नवीन न्यायालयीन
इमारतीचे बांधकाम करणे.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीसीबी-१११७/प्र.क्र.१५६/का.१३.**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १९ जानेवारी २०२२

**पहा :-** १) मा. प्रबंधक (निरीक्षणे-२), उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.बी (डब्ल्यू)/६०८०/२००९(४६)/४४२३, दि.१ फेब्रुवारी, २०१९.
२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्रमांक सीसीबी-१११३/प्र.क्र.२०५/का-१३ दिनांक १२ फेब्रुवारी २०१४

**प्रस्तावना :-**

जव्हार, जि.ठाणे येथे नवीन न्यायालयीन इमारतीचे बांधकाम करणे या कामास उपरोक्त संदर्भाधिन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये रु.३,२७,४१,२२१.०० इतक्या किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. परंतु इमारतीच्या बांधकामाच्या खर्चात वाढ झाल्याने मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधिन क्रमांक १ च्या पत्रान्वये सदर इमारतीच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जव्हार, जि.ठाणे येथील नवीन न्यायायलीन इमारतीचे बांधकाम करणे या बांधकामास एकूण रु.९,२१,१०,४९८.०० (रुपये नऊ कोटी एकविस लाख दहा हजार चारशे अठ्ठयाण्णव फक्त) इतक्या अंदाजित खर्चास खालील विगतवारीनुसार सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशील | सुधारीत प्रशासकीय मान्यता रक्कम रुपयांत |
|---|---|---|
| १ | इमारत बांधकाम खर्च | ५,१३,८३,५६४.०० |
| २ | आकस्मिक खर्च | २०,५५,३२५.०० |
| ३ | विद्युतीकरण | २४,५९,८३७.०० |
| ४ | बाहय पाणीपुरवठा व मलनि:स्सारण | २०,००,०००.०० |
| ५ | भूविकास | ४,१५,७३०.०० |
| ६ | फ्लॅग पोस्ट | १,००,०००.०० |

| | | |
|---|---|---|
| ७ | अग्निशमन यंत्रणा | ५,००,०००.०० |
| ८ | अंतर्गत रस्ते | १२,३७,२३७.०० |
| ९ | पथदिवे | ५,००,०००.०० |
| १० | अर्बोरिकल्चर व बागबगिचे | २,००,०००.०० |
| ११ | संपवेल व पंपहाऊस | ४,५७,४५४.०० |
| १२ | रेनवॉटर हार्वेस्टींग | ३,७८,९४८.०० |
| १३ | फर्निचर | १,०२,७६,७१२.०० |
| १४ | दरसूचीतील वाढ व भाववाढ व कलम २८ | १,०२,७६,७१२.०० |
| १५ | वस्तु व सेवा कर | ९८,६८,९७९.०० |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | **९,२१,१०,४९८.००** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(अ) बांधकाम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

(ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी सविस्तर अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

(क) प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही २०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

(ड) बांधकाम करण्यापूर्वी व काम करताना आवश्यक त्या परवानग्या स्थानिक संस्थाकडून घेण्यात याव्यात.

(इ) सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र. बीडीजी. २०१७/ प्र.क्र.६०/ इमारती-२ दिनांक ७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

(ई) सदर बांधकाम करतांना प्रचलित शासन निर्णय, नियम, सीव्हीसी तत्वे, वित्तीय मर्यादा, विहीत निविदा कार्यपध्दती अनुसरावी.

(य) सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरण्यात येऊ नये.

(फ) सदरचे बांधकाम सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च- ०१, कार्यालयीन इमारती- ०५१, बांधकाम - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०३) न्यायदान (केंद्र पुरस्कृत योजना-राज्य हिस्सा) (०३)(०१) मोठी बांधकामे-५३ मोठी बांधकामे (४०५९ ०६७२) व (२१) न्यायदान (केंद्र पुरस्कृत योजना-केंद्र हिस्सा) (२१)(०१) मोठी बांधकामे ५३- मोठी बांधकामे (४०५९१२२२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६९/इमा-२, दि.५ मार्च २०१९ अन्वये, नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१०२/१४४३, दिनांक १८ डिसेंबर २०२० आणि व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक २५ नाव्हेंबर २०२१ रोजी झालेल्या बैठकीत समितीने दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/ प्र.क्र३०/विनियम भाग-२ दिनांक १७ एप्रिल २०१५ च्या सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग-५ अ.क्र.९ व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अनुसार संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२२०११९१६०२५६९६१२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2022.01.19 16:04:12 +05'30'

**( नितिन वि.जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा.सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
५. मा.प्रबंधक (निरीक्षणे-२), उच्च न्यायालय, अपिल शाखा , मुंबई,
६. मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा न्यायालय, ठाणे
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई,
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई
९. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जि.ठाणे
१०. कार्यकारी अभियंता, ठाणे सार्वजनिक बांधकाम विभाग, जव्हार, जि.ठाणे (मुळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
११. उप विभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकाम उपविभाग जव्हार, जि. ठाणे
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.ठाणे
१३. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२/इमा-१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४. वित्त विभाग/व्यय-६/५,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१५. नियोजन विभाग/का. १४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१६. अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला,
१७. नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
१८. कक्ष अधिकारी, का.-७,११, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१९. निवडनस्ती / संग्रहार्थ कार्या-१३.